**महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक यांना सन २००९-१० करीता भाग भांडवल मंजूर करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : आविम-२००९/प्र.क्र.८२/का-३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च,२०१०

**वाचा** :- १) शासन निर्णय क्र.आविवि-२००४/प्र.क्र.१५/का-३, दिनांक २४-८-२००४.
२) शासन निर्णय क्र. बीयुडी-२००९/प्र.क्र.८/का-७, दिनांक २८ एप्रिल, २००९.
२) शासन निर्णय क्र. बीयुडी-२००९/प्र.क्र.८/का-७, दिनांक ३० जून, २००९.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहाकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांचे क्र.आविम/लेखा-३१/भा.भां२००९-१०/११४७/२०१०, दिनांक ५-१-२०१०.

**प्रस्तावना** :- शासन निर्णय दिनांक २४-८-२००४ अन्वये शासनाने महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रुपये १००.०० कोटी वरुन रुपये २००.०० कोटी करण्यास मंजूरी दिलेली असून सन २००८-०९ पर्यंत रुपये ४६८२.०० लक्ष एवढे भाग भांडवली अंशदान महामंडळास उपलब्ध करुन दिलेले आहे. उपरोक्त अ.क्र.२ व ३ येथील शासन निर्णय, दिनांक २८ एप्रिल,२००९ व दिनांक ३० जून, २००९ अन्वये या महामंडळास सन २००९-१० करीता भाग भांडवली अशंदानापोटी रुपये १५००.०० लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांचे उपरोक्त क्र.४ च्या दिनांक ५-१-२००९ च्या प्रस्तावान्वये भाग भांडवली अशंदानापोटी रु. १५००.०० लक्ष एवढा निधी खालील बाबींवर खर्च करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता.

| अ.क्र. | खर्चाची बाब | रक्कम (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १ | महामंडळाच्या जागेवर गोदाम बांधकाम करण्याचे प्रस्तावित असून या ४ गोदामाच्या बांधकामासाठी आवश्यक तरतूद- | ६२९.६७ |
| २ | उघडयावरील माल सुरक्षीत ठेवण्यासाठी APMC च्या धर्तीवर २० शेडस बांधकामासाठी आवश्यक तरतूद- | २१७.५४ |
| ३ | चंद्रपूर जिल्हयातंर्गत पोभूंर्णा व चंदनखेड येथे राष्ट्रीय समविकास योजनेअतंर्गत गोदाम बांधकामासाठी आवश्यक तरतूद- | २४.४४ |
| ४ | मुख्य कार्यालय व क्षेत्रीय कार्यालय येथील निरुपयोगी वाहना ऐवजी नविन वाहने खरेदी करणे रू ८,२८,६७२/-प्रति वाहन याप्रमाणे गडचिरोली, चंर्पूर, भंडारा व धारणी या ४ उप प्रादेशिक कार्यालयांसाठी नवीन वाहन खरेदीसाठी आवश्यक निधी- | ३३.१५ |

| | | |
|---|---|---|
| ५ | विद्युत लोडशेडिग ला पर्याय म्हणून जनसेट ४० केव्ही चे दोन सेट खरेदीसाठी आवश्यक निधी- | १२.३९ |
| | **एकूण** | **११७.१९** |

**<u>शासन निर्णय</u> :-** महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाने सादर केलेल्या प्रस्तावातील वरील बाबींपैकी खालील बाबींवर भागभांडवली अंशदानातून निधी वितरित व खर्च करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे.

| अ.क्र. | भांडवली खर्चाच्या बाबी | रुपये लाखात |
|---|---|---|
| १ | चंद्रपूर जिल्हयातंर्गत पोभूंर्णा व चंदनखेड येथे राष्ट्रीय समविकास योजनेअतंर्गत गोदाम बांधकामासाठी आवश्यक तरतूद- | २४.४४ |

**२.** महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास संदर्भाधीन अ.क्र.२ व ३ येथील आदेशानुसार मंजूर केलेले भाग भांडवली अंशदान रु.१५००.०० लक्ष तरतूदीपैकी वरील खर्चाच्या बाबीसाठी एकूण **रु.२४.४४ लक्ष (रु. चोवीस लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त)** एवढी तरतूद सन २००९-१० करीता संगणक प्रणालीनुसार वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**३.** आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी उपरोक्त रक्कम **रु. २४.४४ लक्ष (रु. चोवीस लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त)** कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांना अदा करावी.

**४.** यावरील खर्च मागणी क्र. टी-६, "४४२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२-इतर सहकारी संस्था- ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना-(०१)(०२) महाराष्ट्र राज्य सहकारी जनजाती विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान (४४२५ ०४७२), ३२-अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २००९-१० मध्ये केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा व तसा खर्चाबाबतचा अहवाल आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक तसेच शासनास सादर करावा.

**५.** सदर शासन निर्णय हा नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५९/०१०/साउ, दिनांक १५ मार्च, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००३२९१८३८१०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(सो .ना. बागुल)**
**अवर सचिव**

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,मर्या. नाशिक.

महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र.१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लंखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
जिल्हा  कोषागार अधिकारी, नाशिक.
वित्त विभाग ( साऊ) (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई .३२.
नियोजन विभाग (का. १४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक, लेखापरिक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक अॅन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
क.अ. (का-१, ६ व ७), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का-३),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.